**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै. (श्री.) प्रमोद श्रीराम कुकडे, सहा. शिक्षक.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२२/प्र.क्र.८४/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १२ मे, २०२३

**संदर्भ:-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.०४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१ /टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. पत्र क्र. कोव्हीड १९/विमा कवच/सहाय्य/पीएसकुकडे/२०२१-२२/टि ७/१८४१, दि.२६/०३/२०२२.
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. पत्र क्र. कोव्हीड १९/विमा कवच/सहाय्य/पीएसकुकडे/२०२२-२३/टि ७/७०६७, दि.०४/११/२०२२.
५) तहसिलदार तथा तालुका दंडाधिकारी कार्यालय मोहाडी यांचे क्र.कली/नै आ/कावि/१३०६/२०२१, दि.२३/०४/२०२१ चे नियुक्ती आदेश.

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) प्रमोद श्रीराम कुकडे, सहा. शिक्षक यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २४/०४/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) प्रमोद श्रीराम कुकडे, सहा. शिक्षक यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु. ५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी संदर्भ क्र. (३) व (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे.

३. कै.(श्री.) प्रमोद श्रीराम कुकडे, सहा. शिक्षक पदावर महात्मा फुले विद्यालय, धुसाळा, ता.मोहाडी, जि.भंडारा येथे दिनांक १०/०७/१९९५ पासून कार्यरत होते.

४. कै.(श्री.) कुकडे हे कोरोना विषाणू प्रादुर्भाव व प्रतिबंधात्मक उपाययोजनेच्या अनुषंगाने ब्रेक द चैन च्या अनुषंगाने हिवरा (वारेसा) चेक पोस्टवर कोव्हिड-१९ बाबत अनुषंगिक कामकाज केले आहे. सदर बाब तहसिलदार तथा तालुका दंडाधिकारी कार्यालय मोहाडी यांनी दि. २४/०६/२०२२ अन्वये प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) कुकडे यांचा कोव्हिड-१९ मुळे दिनांक २४/०४/२०२१ रोजी मृत्यू झाल्याचे न्यू लाईफ मल्टिस्पेशलिटी रुग्णालय, भंडारा यांनी दिलेल्या मृत्यू अहवालावरुन स्पष्ट होते.

६. नगर परिषद, भंडारा यांचेकडील कै. (श्री.) कुकडे यांचे मृत्यू प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

७. सह पोलिस निरीक्षक/ठाणेदार, पोलिस स्टेशन आंधळगांव, जि.भंडारा व तहसिलदार तथा तालुका दंडाधिकारी कार्यालय मोहाडी यांनी प्रमाणित केल्यानुसार व शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी कागदपत्रांची पडताळणी करुन प्रस्ताव सादर केल्यानुसार कै.(श्री.) प्रमोद कुकडे यांनी कायदेशिर वारस म्हणून वारस (१) श्रीमती वेदीनी प्रमोद कुकडे, (२) श्री.हर्ष प्रमोद कुकडे व (३) श्री.विधी प्रमोद कुकडे यांना एकत्रित रु. ५०.०० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच / सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

८. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०४/२०२१/व्यय ९, दिनांक २७/०५/२०२१ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> "मागणी क्रमांक ई-२, (००)(०१) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य), (२२०२ ०४४२), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)."

९. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२३०५१२१३१३३८१०२१ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.05.12 13:13:30 +05'30'

**(तुषार महाजन)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), भंडारा

**प्रत:- माहितीसाठी**

६. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्रीमती वेदीनी प्रमोद कुकडे,
९. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ८४/२०२२).